**महाराष्ट्र शासन**

क्रमांक: देयक-२०२२/प्र.क्र.८/१३-अे
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व
मत्स्यव्यवसाय विभाग, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १३ जानेवारी, २०२२.

**विषय:- सन २०१८-२०१९ मध्ये उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला कार्यालयाच्या व तालुका बिज गुणन प्रक्षेत्र बोरगांव मंजू, ता.जि.अकोला या प्रक्षेत्रावरील २४०१ ०२६१ लेखाशिर्षा अंतर्गत (०२-मजूरी) व (२१-सामुग्री व पुरवठा) याबाबी खालील प्रलंबित रु.३,२८,०३६/- देयकास प्रशासकीय मंजूरी मिळण्याबाबत.**

**संदर्भ:-** १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३२०/ २०१३/विनिमय, दि.१७/४/२०१५.
२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृषि/लेखा-१/आस्था/देयक/मंजूरी/अमरावती/ ४११८९/२०२१, दि.१४/१२/२०२१.

**ज्ञापन:-**

सन २०१८-२०१९ मध्ये विभागीय कृषि सह संचालक, अमरावती विभाग, अमरावती कार्यालयाच्या अधिनस्त कार्यालय उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला कार्यालयाच्या व कृषि पर्यवेक्षक तालुका बिज गुणन प्रक्षेत्र बोरगांव मंजू, ता.जि.अकोला या प्रक्षेत्रावरील बिजोत्पादन कार्यक्रम व इतर अनुषंगिक कामे कंत्राटदारामार्फत घेतली जातात. सदर कंत्राटदारांच्या प्रलंबित मजूरीच्या कामांचे देयक रु.३,२८,०३६/- (अक्षरी रुपये तीन लाख अठ्ठावीस हजार छत्तीस फक्त) अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग शासन निर्णय दि.१७/४/२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला, उपविभाग-१, अनुक्रमांक-६, नियम ४० नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. त्या अधिकारानुसार सदर ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

३. यावरील येणारा खर्च मागणी क्र.डी-३, २४०१-पिकसंवर्धन, १०३- बी बियाणे, १०३ (००) (०१) तालुका बीज गुणन प्रक्षेत्र (२४०१ ०२६१) अंतर्गत ०२-मजूरी या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करीता उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

४. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे. त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात येईल, याची दक्षता घ्यावी. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय व वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसे आढळल्यास याबाबतची जबाबदारी सर्व संबंधितांवर राहील.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०११३१२४९४००९०१ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2022.01.13 12:51:20 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. विभागीय कृषी सहसंचालक,अमरावती विभाग, अमरावती.
४. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,अकोला.
५. उप विभागीय कृषि अधिकारी, अकोला.
६. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर,
७. महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर,
८. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,अकोला.
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०. सहसंचालक लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई-३२.
११. निवड नस्ती (१३-अे).